व्यसनमुक्ती प्रचारकार्य पदे

संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
यांच्या आस्थापनेवरील व्यसनमुक्ती प्रचारकार्य
योजनेंतर्गत अस्थायी पदे सन २०११-२०१२ या
कालावधीकरीता पुढे चालू ठेवण्यास मंजूरी बाबत..

महाराष्ट्र शासन
सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग
शासन निर्णय क्रमांक : सकआ-२०११/२३०/प्र.क्र.(९८/११)/आस्था-२
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १६ मार्च, २०११.

वाचा : १) शासन निर्णय, सामाजिक न्याय, व विशेष सहाय्य विभाग
क्र. सकआ-२०१०/प्र.क्र.१२९/आस्था-२, दिनांक १२.७.२०१०..
२) संचालक, समाजकल्याण संचालनालय, पुणे यांचे पत्र क्र.सकसं/आस्था-६/दाप्रका/अस्थायी पदे//१०-११/२०११-१२/का-६/२१५ दिनांक ३१.१.२०११..

**शासन निर्णय** :-

शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्रमांक :सकआ-२०१०/प्र.क्र.१२९/आस्था-२, दिनांक १२.७.२०१० अन्वये संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या आस्थापनेवरील व्यसनमुक्ती प्रचारकार्य योजनेंतर्गत ६५ एवढया अस्थायी पदांना दि.२८.२.२०११ पर्यंत चालू ठेवण्यास मंजूरी देण्यात आलेली आहे..

२. सन २०१०-११ वर्षात दिनांक २८.२.२०११ पर्यंत एकुण ६५ पदांना मुदतवाढ देण्यात आलेली आहे. तथापि, त्यातील सद्यस्थितीत ०२ पदे कमी करण्यात येवून एकूण ६३ अस्थायी पदांना मुदतवाढ मंजूरीसाठी संचालकांनी प्रस्तावीत केले आहे. अकोला येथील श्री. मोडक, व्यसनमुक्ती प्रचार अधिकारी यांचे निधन झाल्याने त्यांचे पद कमी करण्यात आले आहे. तसेच संचालनालयाचे अंतर्गत श्री.पी.जी.शिरसाठ यांचे एक पद वर्ग करण्यात आले असल्याने त्यांचे पद मुदतवाढ प्रस्तावातून कमी करण्यात आले आहे. यास्तव, प्रस्तावित ६३ पदांना दिनांक १.३.२०११ ते २९.२.२०१२ या कालावधीसाठी मुदतवाढ मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.

३. प्रमाणित करण्यात येते की, वरील अस्थायी पदे ही सहा महिन्यापेक्षा जास्त कालावधीसाठी रिक्त राहिलेली नाहीत.

४. यावर होणारा खर्च -
(१) २२३५-सामाजीक सुरक्षा व कल्याण.
०२ - समाज कल्याण
१०५- दारुबंदी महाराष्ट्र राज्य जिल्हा परिषद व पंचायत समिती अधीनियम १९६१ च्या कलम १८३ अन्वये जिल्हा परिषदांना आस्थापना अनुदान
(०३) (०१) दारुबंदी प्रचार कार्य
(२२३५-२८०-४) मागणी क्र. एन-४
(२) शासन निर्णय दिनांक १६.८.२००५ अन्वये मंजूर करण्यात आलेल्या २४ पदांसाठी होणारा खर्च.
२२३५-सामाजीक सुरक्षा व कल्याण.
०२ - समाज कल्याण
१०५- दारुबंदी
(१) (एक) दारुबंदी प्रचार कार्य
मागणी क्र. एन-४ (मागणी क्र.एन-४)
उपरोक्त लेखाशीर्षाखाली भागविण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

६. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. असंक-१००४/प्र.क्र.१२(भाग-२)/२००४/वित्तीय सुधारणा-१, दिनांक ४ ऑक्टोबर, २००४ अन्वये प्रशासकीय विभागांना दिलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक संकेतांक २०११०३१६२१५८१९००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( कि. पा. वडते )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,
संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प.,
सर्व विभागीय समाजकल्याण अधिकारी,
सर्व विशेष जिल्हा समाजकल्याण अधिकारी,
सर्व समाजकल्याण अधिकारी (गट-अ), जिल्हा परिषद,
महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर,
अधिदान व लेखाधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी ,
वित्त विभाग, व्यय-१४/अर्थसंकल्प-१९, मंत्रालय, मुंबई-३२,
कक्ष अधिकारी, (का.मावक-२, मावक-४ व अर्थसंकल्प) सा.न्या व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,
निवड नस्ती-का. आस्था-२